

मिशेल आणि तिच्या मुली, मॅलिआ आणि साशा, यांना ऑगस्ट 2008 मधील डेमोक्रॅटीक पक्षाच्या अधिवेशनात पाहून जमावातील लोक रोमांचित झाले. ओबामा कुटुंब लोकांच्या पसंतीस उतरले. यामुळे बराक यांना अध्यक्षपदाच्या उमेदवारीसाठी लोकांचा पाठिंबा मिळाला.

# आमच्या मुलांचे भवितव्य

25 ऑगस्ट 2008 रोजी, कॉलोराडो राज्याच्या डेन्व्हर शहरातील एका मैदानात प्रचंड जमाव जमला. जमावातील लोक डेमोक्रॅटीक पक्षाच्या राष्ट्रीय अधिवेशनासाठी आले होते. लवकरच, हे सर्व डेमोक्रॅट लोक अमेरिकेच्या अध्यक्षपदासाठी बराक ओबामा यांना उमेदवार म्हणून घोषीत करणार होते. पण नंतर तो मंच बराकची पत्नी मिशेलने जिंकून घेतला.

मिशेल समोरच्या जमावाशी संवाद साधण्यास उत्सुक होती. बोलताना आपल्याला प्रत्येक शब्द तोलून-मापून वापरावा लागेल, याची जाणीव तिला होती. अमेरिकेतील एका प्रमुख पक्षाने अध्यक्षपदाची उमेदवारी दिलेले बराक ओबामा हे पहिलेच आफ्रिकन-अमेरिकन होते. आपला पती एक इतिहास रचत आहे, याचे पूर्ण भान मिशेलला होते.

आपले पती बराक हे अध्यक्षपदासाठी कसे सर्वोत्कृष्ट आहेत, याबद्दल मिशेल लोकांशी बोलली. पण आपण नेहमीच मॅलिआ आणि साशा या आपल्या दोन मुलींना प्राधान्य दिले आहे, हेदेखील तिने प्रांजळपणे सांगितले.

"इथे मी फक्त एक आई म्हणून आले आहे. माझ्या जगात कायम माझ्या मुलीच केंद्रस्थानी असतील," हे तिचे उद्गार जमावाला भावले.

अमेरिकेला एक मजबूत देश बनवणे का महत्त्वाचे आहे, यावर मिशेलने आपली मते व्यक्त केली. याचे सर्वप्रथम कारण होते, तिची स्वत:ची मुले आणि जगातील सर्व मुले! "या मुलांचे तसेच आपल्या सर्वांच्या मुलांचे भविष्य या निवडणुकीवर अवलंबून आहे," असे तिने लोकांना सूचित केले.




डेमोक्रॅटिक पक्षाच्या राष्ट्रीय अधिवेशनाच्या पहिल्या रात्री मिशेलचे भाषण हे प्रमुख आकर्षण होते. आपण राष्ट्रीय मंचावर स्वत:ची ओळख बनवू शकतो, हे तिने सिद्ध केले.



बराक आणि मिशेल ओबामा वॉशिंग्टन डी.सी. येथील कॅपिटल सिटी पब्लिक चार्टर स्कूलमध्ये दुसऱ्या इयत्तेच्या वर्गातील मुलांशी संवाद साधताना. अध्यक्ष आणि फर्स्ट लेडी या भूमिकेतून सेवाभावी कार्य करणे त्यांना महत्त्वाचे वाटत असे.

मिशेल ओबामाचे भाषण खूप यशस्वी ठरले. काही महिन्यांनंतर बराक ओबामा अमेरिकेचे 44 वे अध्यक्ष बनले. त्यांची पत्नी मिशेल अमेरिकेची 'फर्स्ट लेडी' बनली.



डावीकडून उजवीकडे: भाऊ क्रेग, वडील फ्रेजर रॉबिन्सन, लहानगी मिशेल आणि आई मरियन रॉबिन्सन. मिशेल कुटुंबातील सर्वांचे एकमेकांशी घनिष्ट संबंध होते.

# संगोपन

मिशेल लॅव्हॉन रॉबिन्सनचा जन्म इलिनॉय राज्यातील शिकागो शहरात 17 जानेवारी 1964 रोजी झाला. मरियन आणि फ्रेजर रॉबिन्सन हे तिचे आईवडील होते. फ्रेजर रॉबिन्सन यांनी शिकागोच्या जल विभागासाठी काम केले. मुलांच्या संगोपनासाठी मरियनने गृहिणीची जबाबदारी स्वीकारली . मिशेलचा भाऊ क्रेग तिच्यापेक्षा दोन वर्षांनी मोठा होता.

फ्रेजर रॉबिन्सन खूप कष्टाळू होते. मिशेल लहान असताना फ्रेजरना मेंदूशी संबंधीत मल्टिपल स्क्लेरॉसिस (एम्.एस्.) हा आजार झाला. या आजारामुळे त्यांचे स्नायू नीट काम करेनासे झाले. यामुळे त्यांना चालणे, हालचाल करणे अवघड झाले. ते अक्षरश: लंगडत चालू लागले. नंतरच्या काळात तर त्यांना काठीचा आधार घेऊन चालावे लागले. 1991 साली या आजारामुळेच त्यांचा मृत्यू झाला.

आजारी अवस्थेतही फ्रेजर रॉबिन्सन यांनी आपले काम सोडले नाही. मिशेल आणि क्रेग त्यांच्याकडून बरेच काही शिकले. “शरीराने दुर्बल झाल्यावरही ते उठून दररोज कामावर जात,” मिशेल एकदा आपल्या भाषणात म्हणाली, “त्यांनी कधी कुठली तक्रार केली नाही, कधी कामावर जाण्यास उशीर केला नाही, कुठल्या शंका-कुशंका व्यक्त केल्या नाहीत. त्यांनी आम्हाला उत्तुंग स्वप्न पाहायला शिकवले.”

मरियन आणि फ्रेजर रॉबिन्सन यांनी मिशेल आणि क्रेगकडून नेहमी सर्वोत्तम कामगिरीची अपेक्षा केली. शाळेनंतर गृहपाठ, अभ्यास करण्यात मुलांचा दिवस निघून जात असे. क्रेगसाठी शाळेचे दिवस तसे सहजसोपे होते, पण मिशेलसाठी मात्र ते खडतर होते. परीक्षेमध्ये उच्च श्रेणी मिळवण्यासाठी तिला खूप अभ्यास करावा लागे.

1977 साली मिशेलने परिसरातील प्राथमिक शाळांमधून पदवीचे शिक्षण पूर्ण केले. पुढे तिने व्हिटनी एम्. यंग मॅग्नेट हायस्कूलमध्ये प्रवेश घेतला. या शाळेत शिकायला संपूर्ण शहरातून विद्यार्थी येत.

1981 साली मिशेलने व्हिटनी यंग शाळेतून पदवी मिळवली. त्यावेळी क्रेग उच्च शिक्षणासाठी प्रिन्स्टन शहरात गेला. प्रिन्स्टन हे न्यू जर्सी राज्यातील एक उत्तम कॉलेज मानले जात असे. क्रेगला परीक्षांमध्ये उत्तम श्रेणी मिळाल्या होत्या, तसेच तो एक उत्तम धावपटू होता.



1981 साली हायस्कूलमधून पदवीधर झाल्यावर घेतलेला मिशेलचा फोटो. मिशेलच्या कुटुंबासाठी शिक्षण अत्यंत महत्त्वपूर्ण होते. स्थानिक हायस्कूलऐवजी मिशेल शिकागोच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या व्हिटनी यंग मॅग्नेट हायस्कूल येथे शिकायला गेली.

यामुळे त्याला प्रिन्स्टन कॉलेजमध्ये प्रवेश मिळण्यात अडचण उद्भवली नाही. मिशेललाही त्याच कॉलेजमध्ये शिकायचे होते. ती म्हणते, “क्रेगला मी चांगली ओळखत होते आणि त्याच्या अभ्यासाची पद्धतही मला माहित होती. मीसुद्धा त्याच्यासारखा अभ्यास करू शकते, असा मला आत्मविश्वास होता.”

मिशेलने आपले म्हणणे खरे केले. तिला प्रिन्स्टन कॉलजमध्ये प्रवेश मिळाला. सप्टेंबर 1981 मध्ये ती पूर्वेकडे एका नव्या जगाचा अनुभव घेण्यास निघाली.



1985 साली मिशेल प्रिन्स्टन विद्यापीठातून पदवीधर झाली. गौरवर्णीय विद्यार्थी बहुसंख्येने असलेल्या या विद्यापीठात ती अल्पसंख्य होती. परंतु इथेच तिला स्वतःची ओळख पटली तसेच कृष्णवर्णीय समाजात असलेले आपले स्थान कळले.

# अल्पसंख्य मिशेल

मिशेल लहानपणापासून ज्या परिसरात राहिली, मोठी झाली त्या परिसरात तिच्यासारख्याच आफ्रिकन-अमेरिकन लोकांची वस्ती होती. हायस्कूलमध्ये शिकत असताना विविध वंशांचे, विविध संस्कृतींची पार्श्वभूमी असलेले विद्यार्थी तिला पाहायला मिळाले. पण प्रिन्स्टनमध्ये जवळजवळ सगळे विद्यार्थी गौरवर्णीय होते. तिथे प्रथमच मिशेलला आपण अल्पसंख्य असल्याचे जाणवले.

वरच्या वर्गात शिकत असताना मिशेलने एक प्रबंध लिहिला – "प्रिन्स्टन येथील सुशिक्षित कृष्णवर्णीय आणि कृष्णवर्णीय समाज". तिने प्रिन्स्टनमधील शेकडो कृष्णवर्णीय विद्यार्थ्यांना आणि पदवीधरांना प्रश्न पाठवले. प्रिन्स्टन त्यांच्या भावनांना आकार देते का, हे तिला पाहायचे होते. गौरवर्णीय बहुसंख्य असलेल्या ठिकाणी शिकायला आल्यावर कृष्णवर्णीय विद्यार्थ्यांमध्ये आपल्या समाजाला मदत करण्याची उर्मी निर्माण होते का, हे तिने अनेकांना विचारले. समाजात आपली भूमिका नेमकी काय आहे, हे या संशोधनातून समजेल अशी मिशेलची अपेक्षा होती.

मिशेलने आपल्या प्रबंधात लिहिले, "प्रिन्स्टनमधील अनुभवांमुळे मी कृष्णवर्णीय असल्याची माझी जाणीव तीव्र झाली." इतर लोक आपल्याकडे विद्यार्थी म्हणून पाहाण्याआधी कृष्णवर्णीय म्हणून पाहातात, असे तिला वाटत असे.

मिशेल आणि तिच्या भावाची श्रद्धा होती की त्यांच्या आईवडिलांनी त्यांचे मोल नसणाऱ्या जगात यशस्वी होण्यासाठी त्यांना पुरेसे आत्मबळ दिलेले आहे. क्रेग रॉबिन्सन यांनी एकदा एका वृत्तपत्रात म्हटले, " गोऱ्या लोकांच्या जगात काळे मूल मोठे होते तेव्हा लोक कुचेष्टेने म्हणतात......तुम्ही निम्न दर्जाचे आहात...... तेव्हा आपलं कुटुंबच आपल्याला सतत जाणीव करून देत असतं......तुम्ही खूप हुशार आहात, चांगले आहात, तुम्ही अवतीभवती असताना खूप छान वाटतं, तुम्ही निश्चितच यशस्वी होऊ शकता, आयुष्याची लढाई खडतर असते वगैरे......" आमच्या आईवडिलांनी आम्हाला असाच आत्मविश्वास देऊन आमच्या यशाचं बीज रोवलं."

मिशेलमधील आत्मविश्वासामुळे तिला प्रिन्स्टन येथे शिकताना खूप फायदा झाला. 1985 साली तिला पदवीने सन्मानित करण्यात आले. मग तिने हार्वर्ड विद्यापीठात कायद्याचे शिक्षण घेतले.



मिशेल आणि तिचा भाऊ क्रेग यांचे आयुष्यभर एकमेकांशी घनिष्ट नाते राहिले.

हार्वर्डमध्ये मिशेलने खूप मेहनत घेऊन शिक्षण पूर्ण केले. तिने आपल्या समाजासाठीही काम केले. आसपासच्या परिसरातील गरीब लोकांना कायदेशीर बाबींमध्ये मदत करणाऱ्या एका गटासोबत तिने काम केले. आयुष्यभर मिशेल अशा प्रकारे इतरांना मदत करत राहिली.

मिशेलने 1988 साली हार्वर्डमधून कायद्याची पदवी प्राप्त केली. शिकागोतील सिडले ऑस्टीन या कायदेविषयक काम करणाऱ्या कंपनीत एक वकील म्हणून तिने काम सुरू केले. मिशेलला तिथे खूप काही शिकायला मिळाले. या नोकरीमुळे तिला पुन्हा शिकागोत जाण्याची संधी मिळाली.



मिशेल आणि बराक ओबामा यांनी 3 ऑक्टोबर 1992 रोजी सिडले ऑस्टीन येथे झालेल्या गाढ मैत्रीनंतर लग्न केले.

# बराकशी ओळख

1989 साली सिडले ऑस्टीन कंपनीत वकिलीचा अभ्यास करणारा एक विद्यार्थी काही काळासाठी काम करण्यास आला. कंपनीच्या अधिकाऱ्याने मिशेलला त्याला मदत करण्याची विनंती केली. या विद्यार्थ्याचे नाव होते, बराक ओबामा.

मिशेल आणि बराक यांच्यात अनेक बाबतीत साम्य होते. ते दोघे हार्वर्ड लॉ कॉलेजमध्ये शिकले होते. दोघांना शिक्षण आणि कुटुंबाप्रती आस्था होती. दोघांना गरजू लोकांना मदत करावीशी वाटे.

मिशेल आणि बराक यांच्यात गाढ मैत्री झाली. ऑक्टोबर 1992 मध्ये त्यांनी लग्न केले.
1991 साली मिशेल शिकागोचे महापौर रिचर्ड डॅली यांच्याकडे काम करू लागली. शिकागोतील व्यवसायांना कायदेशीर मदत करणे, हे तिचे काम होते.

1993 साली ती “पब्लिक अलाइज” या संस्थेची कार्यकारी संचालक बनली. ही संस्था तरुणांना सार्वजनिक सेवा क्षेत्रात काम करण्यासाठी प्रशिक्षित करत असे. मिशेलला आपले काम खूप आवडत असे. “ही नोकरी माझ्या कारकिर्दीतील सर्वोत्कृष्ट गोष्ट आहे,” असे त्यावेळी तिला वाटत असे.

1996 साली बराक इलिनॉय राज्याच्या कायदेमंडळाचे सदस्य बनले. या काळात ते बहुतांशी घरापासून 200 मैल दूर असलेल्या राजधानी स्प्रिंगफिल्डमध्ये राहात.

आता मिशेल आणि बराक यांना आपले एक लहानसे कुटुंब असावेसे वाटू लागले. मातृत्वाची जबाबदारी निभावण्यासाठी आपल्याला थोड्या कमी जबाबदारीची नोकरी स्वीकारायला हवी, असा विचार मिशेलने केला. तिने "पब्लिक अलाइज" या संस्थेची नोकरी सोडली आणि घराजवळ असलेल्या शिकागो विद्यापीठात अर्धवेळ काम स्वीकारले. परिसरातील आणि शहरातील सामाजिक समस्यांबद्दल विद्यार्थ्यांना ती जागृत करू लागली.

जुलै 1998 मध्ये मिशेलने आपल्या पहिल्या मुलीला, मॅलिआ ॲनला जन्म दिला. त्यांची दुसरी मुलगी, नताशा (साशा) हिचा जन्म 2001 साली झाला.

1998 साली बराक अमेरिकेच्या कायदेमंडळाचे सदस्य म्हणून निवडून आले. मग ते वॉशिंग्टन डी.सी. येथे काम करू लागले आणि मिशेल शिकागो येथे घरी राहू लागली. तोवर ती शिकागो विद्यापीठाच्या वैद्यकीय केंद्रात काम करू लागली होती.





नोव्हेंबर 2004 मध्ये बराक यांच्या अमेरिकेन कायदेमंडळ निवडणुकीचा विजयोत्सव साजरा करताना बराक कुटुंबीय! बराक राष्ट्रीय पातळीवर प्रसिद्ध झाल्यावरही मुलांना त्यांनी नेहमी आपल्या आयुष्याच्या केंद्रस्थानी ठेवले.

एव्हाना बराक यांची प्रसिद्धी आणि लोकप्रियता वाढली. नोव्हेंबर 2004 मध्ये त्यांनी डेमोक्रॅटीक सदस्यांच्या राष्ट्रीय अधिवेशनात एक प्रभावी भाषण केले. या भाषणाची देशभर लोकांमध्ये खूप चर्चा झाली. यानंतर ते देशाच्या अध्यक्षपदाची निवडणूक लढण्याचा विचार करू लागले.



2008 साली बराक अमेरिकेचे अध्यक्ष म्हणून निवडून आले. ओबामा कुटुंब व्हाईट हाऊसमध्ये राहाणारे पहिलेच आफ्रिकन-अमेरिकन कुटुंब होते. मिशेलच्या रुपाने अमेरिकेला एक तरूण आणि उत्साही "फर्स्ट लेडी" मिळाली.

# फर्स्ट लेडी (प्रथम महिला)

मिशेलने नोकरी सोडली. ओबामांच्या अध्यक्षपदाची निवडणूक ही तिने कौटुंबिक मोहीम बनवली. "आम्ही सगळ्यांनीच अमेरिकेच्या अध्यक्षपदासाठी प्रयत्न करायला हवा, असं मला वाटतं. मी, बराक, साशा, मॅलिआ, माझी आई, माझा भाऊ, बराकच्या बहिणी – आम्ही सारेच प्रयत्न करत आहोत," मिशेल म्हणते.

बराकच्या अध्यक्षपदासाठी चाललेल्या प्रचारकार्यात मिशेलने धडाडीने भाग घेतला. तिने देशभर भाषणांचा धडाका लावला. टेलीव्हिजनवरही ती दिसू लागली. लोकांवर मिशेलचा प्रभाव पडला. तिच्या आश्वासनांवर त्यांनी विश्वास ठेवला. असंख्य अमेरिकन लोकांसारखेच तिलाही तिच्या मुलांसाठी उत्तम भवितव्य हवे होते. ते घडवत असताना आपल्या मार्गात येणाऱ्या अडथळ्यांवर लोकांनी मात करावी, अशी तिची अपेक्षा होती. अमेरिकन लोकांचे आयुष्य किती संघर्षपूर्ण आहे, हे मिशेल जाणत होती. वडील शारीरिकदृष्ट्या दुर्बल असूनही आईच्या सोबतीने त्यांनी तिचे आणि क्रेगचे भवितव्य उत्तम घडवण्याचा खूप आटापिटा केला, हे तिने लोकांना आवर्जून सांगितले. मिशेलने बराकच्या मनात असलेले उद्याच्या अमेरिकेचे आशादायी चित्रही आपल्या भाषणाद्वारे लोकांपर्यंत पोहोचवले.




काहीवेळा “प्रथम कुटुंब” म्हणून भूमिका निभावणे, ही एक मोहक कामगिरी असते. जानेवारी 2009 मध्ये बराक आणि मिशेल यांनी शपथविधी सोहळ्यात आपल्या शानदार उपस्थितीने सर्वांची मने जिंकली.





बराक यांचा अध्यक्षपदाचा शपथविधी हा अमेरिकेसाठी एक ऐतिहासिक क्षण होता. वॉशिंग्टन डी.सी. येथे भव्य समुदायासमोर मिशलने मोठ्या अभिमानाने बायबल स्वत:च्या हातात धरले. बराकने मिशेलच्या हातातील बायबलवर हात ठेवून अध्यक्षपदाची शपथ घेतली. त्यांच्या मुली मॅलिआ आणि साशाही या अविस्मरणीय क्षणाच्या साक्षीदार होत्या.

4 नोव्हेंबर 2008 रोजी अमेरिकन लोकांनी बराक ओबामा यांना अमेरिकेचे अध्यक्ष म्हणून निवडले. अमेरिकेच्या इतिहासात प्रथमच एक आफ्रिकन-अमेरिकन कुटुंब व्हाईट हाऊसमध्ये राहाणार होते. मिशेलची आईदेखील ओबामा कुटुंबाला तिथे स्थिरस्थावर होण्यात मदत करण्यासाठी व्हाईट हाऊसमध्ये राहाण्यास गेली.

व्हाईट  हाऊस हे मिशेल आणि बराक यांच्या मुलींसाठी सोयीस्कर ठरले. प्रथमच बराक जवळजवळ रोज नाश्ता तसेच रात्रीच्या जेवणासाठी घरी येऊ लागले.

"व्हाईट हाऊसमध्ये आम्ही रात्रीचे जेवण एकत्र घेऊ लागलो. दौऱ्यावर नसताना बराक रात्री मुलींना झोपवू लागले. बऱ्याच वर्षांनंतर आम्ही इतका वेळ एकत्र घालवला," मिशेलने पीपल्स मासिकाला एका मुलाखतीदरम्यान सांगितले.

आपल्या कुटुंबाची घडी नीट बसल्यावर मिशेलने फर्स्ट लेडी म्हणून आपली भूमिका समजून घेतली. सामाजिक कार्यात लोकांनी सेवाभावी वृत्तीने सहभाग घ्यावा, सेवाभाव हा अमेरिकन लोकांच्या दैनंदिन आयुष्याचा भाग बनावा, हे मिशेलचे उद्दीष्ट होते. यासाठी तिने जून 2009 मध्ये "युनायटेड व्ही सर्व्ह" हा देशव्यापी प्रकल्प हाती घेतला.




'कॅपिटल एरिया फूड बँक'च्या मेळाव्यात "प्रथम महिला" मिशेल ओबामा. ही बँक गरजू लोकांना अन्न पुरवते. अमेरिकेचे उपाध्यक्ष जो बिडेन यांची पत्नी जिल बिडेन मिशेलच्या डावीकडे उभी आहे.




मिशेल, मॅलिआ, साशा, मिशेलचा भाऊ क्रेग इराक आणि अफगाणिस्तानात कार्यरत असलेल्या स्वयंसेवकांसाठी सामान बांधताना. ओबामा कुटुंबाने सेवाभावी वृत्तीला नेहमीच महत्त्वाचे मूल्य मानले.



"यूनायटेड व्ही सर्व्ह" यांच्या एका प्रकल्प मोहिमेत सहभागी झालेल्या मिशेल.




वॉशिंग्टन डी.सी. येथील मिरियमच्या स्वयंपाकघरात मिशेल बेघर लोकांना अन्न देताना. असे सेवाभावी काम करण्यात तिला खूप आनंद मिळत असे.

आपल्या देशासाठी काहीतरी करण्यास मिशेल आसुसलेली असे. तिला सामाजिक गटांसोबत काम करण्यास आणि त्यातून जे शिकायला मिळाले त्याबद्दल बराक यांना सांगण्यास आवडत असे. यातून, आयुष्य अधिक सुखकर बनवण्यासाठी लोकांनी काय करायला हवे, हे समजण्यास बराक यांना मदत मिळावी, हाच मिशेलचा हेतू असे.

निवडणुकीच्या काही महिन्यांपूर्वी मिशेलने म्हटले होते, "लोक नेहमीपेक्षा वेगळं काहीतरी करण्यासाठी उत्सुक आहेत, असं मला जाणवतं. मी स्वत: साऱ्या अनुकूल आणि प्रतिकूल गोष्टींना सामोरं जाण्यास तयार आहे. पण मी पतीसोबत व्हाईट हाऊसमध्ये काम करण्यास आणि आपल्या देशाला एका वेगळ्या उंचीवर नेण्यास उत्सुकही आहे."

## कालक्रम

**1964** 17 जानेवारी रोजी मिशेल लॅव्हॉन रॉबिन्सनचा जन्म.
**1977** प्राथमिक शाळेतून पदवीधर.
1981 शिकागोतील व्हिटनी एम्. यंग मॅग्नेट हायस्कूलमधून पदवीधर.
**1985** प्रिन्स्टन विद्यापीठातून पदवीधर.
**1988** हार्वर्ड लॉ स्कूलमधून पदवीधर आणि सिडले ऑस्टीन येथे वकील म्हणून नोकरी.
**1989** बराक ओबामा यांची भेट.
**1991** शिकागोचे महापौर रिचर्ड डॅली यांच्याकडे नोकरी.
**1992** 3 ऑक्टोबर रोजी बराकशी लग्न.
1993 "पब्लिक अलाइज" संस्थेत कार्यकारी संचालक.
**1996** बराक इलिनॉय राज्याच्या कायदेमंडळाचे सदस्य बनले.
**1998** मुलगी मॅलिआचा जन्म. शिकागो विद्यापीठात अर्धवेळ नोकरी.
**2001** मुलगी नताशा (साशा)चा जन्म. शिकागो विद्यापीठाच्या वैद्यकीय केंद्रात काम.
**2004** बराकची अमेरिकेच्या सर्वोच्च कायदेमंडळात निवड. डेमोक्रॅटीक पक्षाच्या राष्ट्रीय अधिवेशनात भाषण.
**2007** बराक यांची अमेरिकेच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीसाठी उमेदवारी जाहीर. मिशेलने त्यांच्यासोबत प्रचार करण्यासाठी नोकरी सोडली.
**2008** ऑगस्टमध्ये डेमोक्रॅटीक पक्षाच्या राष्ट्रीय अधिवेशनात भाषण. नोव्हेंबरमध्ये बराक यांची अध्यक्षपदी निवड.
**2009** बराक यांचा अध्यक्षपदाचा शपथविधी. ओबामा कुटुंब व्हाईट हाऊसमध्ये स्थानांतरित. अमेरिकेच्या लोकांना सेवाभावी काम करण्यास प्रेरित करण्यासाठी मिशेलने "युनायटेड व्ही सर्व्ह" प्रकल्प सुरू केला.

समाप्त